**अस्थायी पदांना मुदतवाढ/सेवासातत्य.......**

**अधीक्षक अभियंता, कुकडी प्रकल्प मंडळ, पुणे यांचे अधिपत्याखालील वेगवर्धित सिंचन लाभ विशेष पथक, कोथरुड, पुणे.**

# महाराष्ट्र शासन

## जलसंपदा विभाग

**शासन निर्णय क्रमांक : पीएलएन-२०२०/प्रक्र-५३/ निवसं-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १२ मार्च, २०२०.

**संदर्भ :** १) उप अधीक्षक अभियंता, कुकडी सिंचन मंडळ, पुणे यांचे पत्र क्रमांक कुसिंमं/पशा/आ-५/२२७/ सन २०२०, दि.१७.१.२०२०.

२) जलसंपदा विभाग, शा.नि.क्र.पीएलएन-२०१९/प्रक्र-३८/निवसं-१, दि.४.१०.२०१९.

३) वित्त विभाग, शा.नि.क्र.पदनि-२०१६/प्रक्र-०८/१६/आ.पु.क., दि.१२.२.२०२०.

४) जलसंपदा विभाग पत्र क्र.आढावा-२०२०/प्रक्र-०६/आस्था(पुनर्रचना), दिनांक १८.२.२०२०.

**प्रस्तावना :-**

शासन निर्णय दिनांक १८.११.२००८ अन्वये कार्यकारी अभियंता, वेगवर्धित सिंचन लाभ विशेष पथक, पुणे साठी महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळाच्या कार्यालयातील व जलसंपदा विभागाच्या आढाव्याअंती अतिरिक्त ठरलेल्या आस्थापनेतून अंतर्गत फिरवाफिरवीने १३ पदे मंजूर करण्यात आलेली आहेत. त्याचप्रमाणे शासन निर्णय दिनांक ०१.०८.२००९ अन्वये अतिरिक्त ४ पदे उपलब्ध करुन देण्यात आली आहेत. त्यामुळे सदर पथकासाठी एकूण १७ पदे मंजूर करण्यात आली आहेत. सदर पदे विविध आस्थापनांवरुन उपलब्ध करुन दिलेली आहेत. सदर पदांना दिनांक ०१ मार्च, २०२० पासून दिनांक ३१ ऑगस्ट, २०२० पर्यंत सेवासातत्य मंजूरी प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

मुख्य अभियंता, (जसं) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्या नियंत्रणाखालील अधीक्षक अभियंता, कुकडी प्रकल्प मंडळ, पुणे यांचे अधिपत्याखालील कार्यकारी अभियंता, वेगवर्धित सिंचन लाभ विशेष पथक, पुणे यांच्या नियत अस्थायी आस्थापनेवरील सोबतच्या विवरणपत्रातील १७ पदांना खालील अटींच्या अधिन राहून दिनांक ०१.०३.२०२० ते दिनांक ३१.०८.२०२० पर्यत सेवा सातत्य चालू ठेवण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

अ) नियत अस्थायी पदे ६ महिन्यापेक्षा जास्त कालावधीसाठी रिक्त नाहीत.

ब) नियत अस्थायी आस्थापनेवरील पदे ही दि.०६.०२.२००३ च्या शासन निर्णयान्वये मंजूर सुधारित आकृतीबंधानुसार ४५२९७ पदांच्या मर्यादेत आहेत.

नियत अस्थायी आस्थापनेवरील उपरोक्त पदांवर होणारा खर्च मागणी क्र. आय-५, ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका, (०४) योजनेतर-वेतनावरील खर्चासाठी भाग भांडवली अंशदान, (०४) (०१) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान, (४७०१ आय १६२) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो २०२०-२१ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर आदेश शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक पदनि-२०१६/प्रक्र-८/१६/आ.पु.क. दिनांक १२.०२.२०२० अन्वये प्रशासकीय विभागांस प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार, तसेच आ(प्रशि), जलसंपदा विभाग यांच्या दि.१८.२.२०२० च्या पत्रानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००३१२१७३६०८६४२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

SHAILA BABAN YADAV

Digitally signed by SHAILA BABAN YADAV
DN: CN = SHAILA BABAN YADAV, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPT
Date: 2020.03.12 17:38:32 +05'30'

**(शैला ब. यादव)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रतः**

१. महालेखापाल (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
२. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
३. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.
४. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, पुणे,
५. अधीक्षक अभियंता, कुकडी प्रकल्प मंडळ, पुणे.
६. कार्यकारी अभियंता, वेगवर्धीत सिंचन लाभ विशेष पथक, पुणे

**प्रत माहितीसाठी-**

१. मुख्य अभियंता, (जसं) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
२. कक्ष अधिकारी, मोप्र-१, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई

**प्रत** : निवसं-१ (कार्यासन संग्रहार्थ)

# विवरणपत्र

जलसंपदा विभाग, शा.नि.क्रमांक : पीएलएन-२०२०/प्रक्र-५३/ निवसं-१
दिनांक : १२ मार्च, २०२० चे सहपत्र
कुकडी प्रकल्प मंडळ अंतर्गत वेगवर्धित सिंचन लाभ विशेष पथक, पुणे अंतर्गत नियत अस्थायी आस्थापना

| अ. क्र. | **पदनाम** | **पदसंख्या** |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | कार्यकारी अभियंता | १ |
| २ | उपविभागीय अभियंता | २ |
| ३ | सहा. अभियंता श्रे.२/ शाखा अभियंता | ६ |
| ४ | अनुरेखक | १ |
| ५ | लघुटंकलेखक | १ |
| ६ | वरिष्ठ लिपीक | १ |
| ७ | कनिष्ठ लिपीक (लिपिक/टंकलेखक) | १ |
| ८ | वाहन चालक | १ |
| ९ | शिपाई | ३ |
| | **एकूण** | **१७** |

SHAILA BABAN YADAV

Digitally signed by SHAILA BABAN YADAV
DN: CN = SHAILA BABAN YADAV, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPT
Date: 2020.03.12 17:39:13 +05'30'

**(शैला ब.यादव)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**